**<u>महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान</u>**
**अंतर्गत जमीन संपादन करताना मोबदला निश्चित**
**करण्याच्या जबाबदारीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण-२०१७/प्र.क्र.६१७(अ)/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १७ डिसेंबर, २०१८

**<u>संदर्भ :-</u>**

शासन निर्णय, नगर विकास विभाग, समक्रमांक दिनांक ०४ मे, २०१८.

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण व अन्य केंद्रीय संस्थांकडून ज्या प्रकल्पांसाठी अर्थसहाय्य प्राप्त आहे. अशा प्रकल्पांच्या अनुषंगाने संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुषंगिक भूसंपादनासाठी अनुदान मंजूर करण्याबाबत शासनाने दिनांक ०४ मे, २०१८ च्या शासन निर्णयाद्वारे धोरण विहीत केले आहे. त्यास अनुसरुन राज्यातील विविध महानगरपालिकांकडून प्रस्ताव प्राप्त होत आहे. सदर प्रस्तावांच्या अनुषंगाने प्राप्त होणाऱ्या मोबदल्याच्या निश्चिती संदर्भात जबाबदारी निश्चित करण्यासाठी कार्यपध्दती विहीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत राष्ट्रीय महामार्गावरील नागरी क्षेत्रातील उड्डाणपूल, आरओबी, आरयुबी यांच्या कामासाठी केंद्रीय भूपृष्ठ वाहतूक मंत्रालय भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणामार्फत राबविण्यात येत असलेले प्रकल्प कालमर्यादेत पूर्ण करण्यासाठी अशा प्रकल्पांच्या अनुषंगाने केंद्र शासनाच्या प्राधिकरणाची वैधानिक जबाबदारी नसलेल्या व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची जबाबदारी असलेल्या जागांचे भूसंपादनासाठी आवश्यक असलेला निधी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे. असे भूसंपादन राज्य शासनाच्या भूसंपादन धोरणानुसार करण्यात यावे व प्रस्तावानुसार भूसंपादनासाठी द्यावयाची परिगणना शासनाच्या भूसंपादन धोरणामध्ये विहीत केलेल्या दरानुसार करण्यात यावी. तसेच, निधीच्या पात्र-अपात्रतेबाबत आवश्यक ती छाननी संबंधित जिल्हाधिकारी यांनी करावी, अशा स्पष्ट सूचना समक्रमांकाच्या दिनांक ०४ मे, २०१८ च्या शासन निर्णयाद्वारे देण्यात आल्या आहेत. या प्रयोजनासाठी मोबदला निश्चित करण्याची जबाबदारी **<u>जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील खालील समितीमार्फत</u>** करण्यात यावी.

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २) | संबंधित महानगरपालिकेचे आयुक्त | सदस्य |
| ३) | सहायक संचालक, नगर रचना | सदस्य |
| ४) | उप जिल्हाधिकारी, भूसंपादन | सदस्य सचिव |

२. सदर समितीने शासनाच्या प्रचलित धोरणानुसार मोबदला निश्चित करावा. यानुसार ज्यांना मोबदला दिला जाणार आहे, त्यांच्या पात्र-अपात्रतेबाबत छाननी करण्याची तसेच मोबदल्याच्या परिगणनेच्या अचूकतेबाबतची संपूर्ण जबाबदारी सदर समितीची व अंतिमत: संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकरणात अतिरिक्त मोबदल्याची परिगणना झाल्याचे निदर्शनास आल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील. सबब, संबंधित जिल्हाधिकारी यांनी अशा प्रस्तावाच्या अनुषंगाने तपासणी करुन प्रस्ताव सादर करताना त्यांच्या स्तरावरुन समितीमार्फत तसेच व्यक्तिश: सर्वंकष तपासणी करुन त्या आधारेच मोबदला प्रदानाची रक्कम प्रमाणित करुन त्याबाबतचा प्रस्ताव शासनाकडे सादर करावा. यानुसार मोबदल्याची परिगणना करताना राज्य शासनाच्या धोरणाबरहुकूम परिगणना झाल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२१७१११०५२५०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2018.12.17 17:59:28 +05'30'

**( पां. जो. जाधव )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

५. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.

७. विभागीय आयुक्त, (सर्व)

८.आयुक्त, महानगरपालिका (सर्व)

९. जिल्हाधिकारी (सर्व)

१०.जिल्हा प्रशासन अधिकारी (सर्व)

११.निवडनस्ती, नवि-३३.

*****